कोषागारातून रोखीने देय
आदेश क्रमांक-४

सन २०१४-१५ मधील केंद्र शासनाने वितरीत केलेल्या निधीस अनुरुप राज्य हिस्सा (एस.सी.पी.) निधी वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः इंआयो-२०१४/प्र.क्र.२३७/योजना-१०**
बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड
फोर्ट, मुंबई-४०० ००१
तारीखः ०७ मार्च, २०१५.

**वाचा :**

१) सह सचिव, भारत सरकार, ग्रामीण विकास मंत्रालय, यांचे क्र.J-११०१४/२/२०१२-RH, दिनांक ४ फेब्रुवारी, २०१३ चे पत्र.
२) शासन निर्णय क्रमांकः इंआयो २०१३/प्र.क्र.२९६/ योजना-१०, दि. ०७ नोव्हेंबर, २०१३.
३) संचालक, भारत सरकार, ग्रामीण विकास मंत्रालय यांचे No.J-१२०२५/१/२०१४-RH (AC)-१/A-Mah.(१st instt.), दिनांक १८ जून, २०१४ चे पत्र.
४) शासन निर्णय क्र.इंआयो-२०१४/प्र.क्र.२३७/योजना-१०, दि.१० नोव्हेंबर, २०१४

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाने संदर्भ क्र.१ येथील दि.१.४.२०१३ च्या पत्रान्वये वर्ष २०१३-१४ पासून घरकुलाच्या अनुदानात वाढ करुन ती रु.७०,०००/- (रु.सत्तर हजार फक्त) अशी केली असुन त्या अनुषंगाने राज्यशासनाने उपरोक्त क्र. २ येथील शासन निर्णय दि.७.११.२०१३ च्या द्वारे राज्य हिस्सा (२५%) रु.१७,५००/- अधिक राज्याचा अतिरिक्त हिस्सा म्हणून रु.२५,०००/ असे अनुदान निश्चित केले आहे. राज्य शासनाने घरकुलाची रक्कम रू.१,००,०००/- इतकी निश्चित केलेली आहे.

केंद्र शासनाने सन २०१४-१५ करिता पहिला हप्त्यामध्ये वितरित केलेल्या अनुदानाच्या अनुषंगाने राज्याचा समरुप हिस्सा व राज्याचा अतिरिक्त हिस्सा सन २०१४-१५ मधील मंजूर करण्यात आलेल्या घरकुलांसाठी वितरीत करावयाचा आहे.

राज्य शासनाच्या सामाजिक न्याय विभागाने इंदिरा आवास योजनेकरीता २०१४-२०१५ या चालू वित्तीय वर्षासाठी जिल्हानिहाय व लेखा शिर्षनिहाय उपलब्ध केलेल्या तरतूदींच्या अधीन राहून राज्य हिश्श्यापोटी विशेष घटक योजनेंतर्गत देय असणारा (पहिला हप्ता) रुपये ६३,४३,६३,०००/-(रु.त्रेसष्ठ कोटी त्रेचाळीस लक्ष त्रेसष्ठ हजार फक्त) लक्ष निधी संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. आत रू.४२,२९,०९,०००/- (बेचाळीस कोटी एकोणतीस लक्ष नऊ हजार फक्त) निधी राज्यातील जिल्हयांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी केंद्रपुरस्कृत इंदिरा आवास योजनेसाठी सोबत जोडलेल्या विवरणपत्र "अ" नुसार ग्राम विकास व जलसंधारण विभागाने विशेष घटक योजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून रुपये ४२,२९,०९,०००/- (बेचाळीस कोटी एकोणतीस लक्ष नऊ हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देत आहे.

विवरणपत्र "अ" मध्ये लेखाशिर्षातंर्गत जिल्हानिहाय खाली दर्शविल्याप्रमाणे रकमा संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याकडे शासन सुपूर्द करीत असून, त्या संबंधित जिल्हयाच्या कोषागारातून तात्काळ रोखीने काढण्यास शासन मंजूरी देत आहे. सदर खर्च खाली दर्शविलेल्या अर्थसंकल्पीय लेखाशीर्षाखालील सन २०१४-१५ च्या उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

| विवरणपत्र | अर्थसंकल्पिय लेखाशीर्षव संकेतांक क्रमांक | वितरीत करण्यात आलेली एकूण रक्कम (रूपये लाखात) | |
|---|---|---|---|
| | | अंकी | अक्षरात |
| जोडपत्र<br>"अ"<br>(एस.सी.पी.) | मागणी क्रमांक एल-०३<br>२५०५ ग्रामीण सेवा योजन ६० इतर कार्यक्रम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (एक)-इंदिरा आवास योजना (दोन)<br>**विशेष घटक योजना इंदिरा आवास योजना इंदिरा आवास योजनेअंतर्गत खर्च भागविण्यासाठी जिल्हा ग्रामीण विकास अभिकरण/जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५०५०५७७)** | रू.४२२९.०९ | रु. बेचाळीस कोटी एकोणतीस लक्ष नऊ हजार फक्त |

वितरीत करण्यात आलेल्या निधीमध्ये राज्य हिस्सा व राज्य अतिरिक्त हिश्याबरोबरच ४% प्रशासकीय खर्चासाठीचा निधी देखील वितरीत करण्यात आलेला आहे. या ४% प्रशासकीय निधीमधील ०.५% निधी राज्य शासनाच्या खात्यांतर्गत (जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,ठाणे) वर्ग करण्यात यावा.

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी सदरहू निधी मिळाल्यानंतर हा निधी संबंधित यंत्रणांना / पंचायत समित्यांना एक दिवसांच्या आत वितरीत करावा. यंत्रणांना/अधिका-यांना वितरीत केलेल्या निधीच्या

आदेशाची एक प्रत न चुकता या विभागास पृष्ठांकित करावी. वितरीत निधी योजनाबध्द नियोजन करुन खर्च करावा. तसेच आपल्या यंत्रणेस एकूण प्राप्त हप्ता व अखर्चित निधी मिळून जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडे एकूण उपलब्ध निधीमधून माहे मार्च, २०१५ अखेर पर्यंत १०० टक्के खर्च होईल, याची खबरदारी घ्यावी.

येथे असेही नमूद करण्यात येते की हा निधी मागणी क्र.एल ०३, २५०५ ग्रामीण सेवा योजना ६० इतर कार्यक्रम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (एक) इंदिरा आवास योजना इंदिरा आवास योजनेअंतर्गत खर्च भागविण्यासाठी जिल्हा ग्रामीण विकास / जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५०५०५७७) या लेखाशिर्षाखालील निधी जिल्हाधिकारी यांचेकडून संबधीत जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना वितरीत करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय (१) वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक: ३४/२०१५ व्यय-१५, दिनांक १५.१.२०१५ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने आणि योजनेच्या सन २०१४-१५ च्या अर्थसंकल्पिय तरतूदीचे मासिक विवरण पत्र (Monthly Cash Flow) यास अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०७१६१६४२२८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Raghunath Harishchandra Shrawanpatil

Digitally signed by Raghunath Harishchandra Shrawanpatil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Raghunath Harishchandra Shrawanpatil
Date: 2015.03.12 15:03:29 +05'30'

( र.ह.श्रावणपाटील )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मंत्री ग्राम विकास यांचे सचिव

२) सर्व विभागीय आयुक्त

३) सर्व जिल्हाधिकारी

४) वित्त विभाग, कार्यासन क्रमांक व्यय-१५ व अर्थसंकल्प ३ व १७
५) आदिवासी विकास विभाग, कार्यासन क्रमांक ७, १२,मंत्रालय, मुंबई-४०००३२
६) नियोजन विभाग,,मंत्रालय, मुंबई-४०००३२
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
९) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखापरिक्षा), मुंबई
१०) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखापरिक्षा) नागपूर
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (संबधित १५ जिल्हे)
१२) प्रकल्प संचालक,जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा ( संबधित १५जिल्हे )
१३) जिल्हा कोषागार अधिकारी ( संबधित १५ जिल्हे )
१४) अप्पर संचालक,एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष,पे ॲन्ड अकौंटस कॅाम्प्लेक्स बॅरेकनं.१४ मुंबई -२१( ५ जादा प्रतीसह )
१५) कक्ष अधिकारी, कार्यासन क्रमांक वित्त -१ ( ग्रामविकास )
१६) निवडनस्ती ( कार्यासन क्रमांक योजना-१० ).

| विवरणपत्र - अ | | | |
|---|---|---|---|
| इंआयो-२०१४/प्र.क्र.२३७/योजना-१०, दिनांक ०७ मार्च, २०१५, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१ चे सहपत्र | | | |
| विशेष घटक योजना (S.C.P.) | | | |
| अ.क्र | जिल्हा | प्रत्यक्ष करावयाचे वितरण रूपये (अंकात) | प्रत्यक्ष करावयाचे वितरण रूपये (अक्षरात) |
| १ | २ | ३ | ४ |
| १ | अहमदनगर | रू.६,६०,००० | रूपये सहा लक्ष साठ हजार फक्त |
| २ | अकोला | रू.९३,९४,००० | रूपये त्र्याण्णव लक्ष चौऱ्याण्णव हजार फक्त |
| ३ | अमरावती | रू.४,३३,३५,००० | रूपये चार कोटी तेहतीस लक्ष पस्तीस हजार फक्त |
| ४ | औरंगाबाद | रू.१,४२,१५,००० | रूपये एक कोटी बेचाळीस लक्ष पंधरा हजार फक्त |
| ५ | भंडारा | रू.१,८९,२२,००० | रूपये एक कोटी एकोणनव्वद लक्ष बावीस हजार फक्त |
| ६ | बुलढाणा | रू.३,३२,२४,००० | रूपये तीन कोटी बत्तीस लक्ष चौवीस हजार फक्त |
| ७ | चंद्रपुर | रू.२,२९,३८,००० | रूपये दोन कोटी एकोणत्तीस लक्ष अडोतीस हजार फक्त |
| ८ | धुळे | रू.१,०२,७६,००० | रूपये एक कोटी दोन लक्ष शहात्तर हजार फक्त |
| ९ | गडचिरोली | रू.५५,६९,००० | रूपये पंचावन लक्ष एकोणसत्तर हजार फक्त |
| १० | गोंदिया | रू.१,६४,७७,००० | रूपये एक कोटी चौसष्ठ लक्ष सत्याहत्तर हजार फक्त |
| ११ | हिंगोली | रू.२,०३,०४,००० | रूपये दोन कोटी तीन लक्ष चार हजार फक्त |
| १२ | जळगांव | रू.१,७३,३९,००० | रूपये एक कोटी त्र्याहत्तर लक्ष एकोणचाळीस हजार फक्त |
| १३ | जालना | रू.२,८३,१२,००० | रूपये दोन कोटी त्र्याऐंशी लक्ष बारा हजार फक्त |
| १४ | कोल्हापूर | रू.५२,९०,००० | रूपये बावन्न लक्ष नव्वद हजार फक्त |
| १५ | लातूर | रू.४,६३,५६,००० | रूपये चार कोटी त्र्येसष्ठ लक्ष छपन्न हजार फक्त |
| १६ | नागपूर | रू.६०,८८,००० | रूपये साठ लक्ष अठ्ठयाऐंशी हजार फक्त |
| १७ | नांदेड | रू.५,९२,४८,००० | रूपये पाच कोटी ब्याण्णव लक्ष अठ्ठेचाळीस हजार फक्त |

| विवरणपत्र - अ | | | |
|---|---|---|---|
| इंआयो-२०१४/प्र.क्र.२३७/योजना-१०, दिनांक ०७ मार्च, २०१५, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१ चे सहपत्र | | | |
| विशेष घटक योजना (S.C.P.) | | | |
| अ.क्र | जिल्हा | प्रत्यक्ष करावयाचे वितरण रूपये (अंकात) | प्रत्यक्ष करावयाचे वितरण रूपये (अक्षरात) |
| १८ | नाशिक | रू.१,५८,०४,००० | रूपये एक कोटी अठ्ठावन्न लक्ष चार हजार फक्त |
| १९ | उस्मानाबाद | रू.४८,१२,००० | रूपये अठ्ठेचाळीस लक्ष बारा हजार फक्त |
| २० | परभणी | रू.१,३७,३०,००० | रूपये एक कोटी सदोतीस लक्ष तीस हजार फक्त |
| २१ | रायगड | रू.३७,१९,००० | रूपये सदोतीस लक्ष एकोणवीस हजार फक्त |
| २२ | रत्नागिरी | रू.७२,६४,००० | रूपये बहात्तर लक्ष चौसष्ठ हजार फक्त |
| २३ | सातारा | रू.४,१३,००० | रूपये चार लक्ष तेरा हजार फक्त |
| २४ | सिंधुदुर्ग | रू.१७,७२,००० | रूपये सतरा लक्ष बहात्तर हजार फक्त |
| २५ | ठाणे | रू.१,३८,००० | रूपये एक लक्ष अडोतीस हजार फक्त |
| २६ | वर्धा | रू.४०,६८,००० | रूपये चाळीस लक्ष अठ्ठसष्ठ हजार फक्त |
| २७ | वाशिम | रू.३६,२८,००० | रूपये छत्तीस लक्ष अठ्ठावीस हजार फक्त |
| २८ | यवतमाळ | रू.९६,१४,००० | रूपये शहाण्णव लक्ष चौदा हजार फक्त |
| | **एकूण** | **रू.४२,२९,०९,०००** | **रूपये बेचाळीस कोटी एकोणतीस लक्ष नऊ हजार फक्त** |

Raghunath Harishchandra Shrawanpatil

Digitally signed by Raghunath Harishchandra Shrawanpatil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Raghunath Harishchandra Shrawanpatil
Date: 2015.03.12 15:04:07 +05'30'

( र.ह.श्रावणपाटील )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन